**शासकीय पुरुष भिक्षेकरी गृह पुई कोलाड, ता. रोहा, जि. रायगड येथील भिक्षेकरी गृहाच्या स्वतंत्र इमारतीचे बांधकाम करणे या ₹८,०९,१६,५६०/- किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः भिक्षेगृ-२०२२/प्र.क्र. २९/का-९**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक-१३ मार्च, २०२४.

वाचा :-

१. आयुक्त, महिला व बालविकास आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. मबाविआ/ बांधकाम/२०२३-२४/९२२, दि.१४/०२/२०२४
२. सहायक आयुक्त (भिप्रशा), महिला व बालविकास आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. मबाविआ/ भिप्रशा/का-८/भिगृ पुई कोलाड/नवीन इमा/ बांधकाम प्रस्ताव/२०२३-२४/१०१,दि.१२/०३/२०२४
३. सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१० /इमा-२, दि.२५/०९/२०१९
४. नियोजन विभाग, शासन परिपत्रक क्र. ससमा-२०१०/प्र.क्र.४८(भाग-१)/का-१४६१, दि.११/६/२०१८
५. वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम, भाग-२, दि.१७/०४/२०१५

**प्रस्तावना**

शासकीय पुरुष भिक्षेकरी गृह पुई कोलाड, ता. रोहा, जि. रायगड येथील भिक्षेकरीगृह या संस्थेच्या इमारती जिर्ण व पडक्या असून निसर्ग चक्रीवादळामध्ये इमारतींची अत्याधिक हानी झाली आहे. तसेच, उपविभागीय अधिकारी, सार्वजनिक बांधकाम रोहा यांनी दि. १५/०२/२०१६ रोजीच्या पत्रान्वये अधिक्षक, शासकीय पुरुष भिक्षेकरी गृह पुई कोलाड, ता. रोहा, जि. रायगड यांना “सध्याच्या इमारती बऱ्याच जुन्या म्हणजेच ब्रिटीशकालीन असून सदर इमारती दुरुस्त केल्यास या दुरुस्तीचा खर्च वाया जाऊ शकतो” असे कळविले आहे. सबब, शासकीय पुरुष भिक्षेकरी गृह पुई कोलाड, ता. रोहा, जि. रायगड येथे भिक्षेकरीगृहाच्या स्वतंत्र इमारतीचे बांधकाम करणे या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासकीय पुरुष भिक्षेकरी गृह पुई कोलाड, ता. रोहा, जि. रायगड येथे भिक्षेकरीगृहाच्या स्वतंत्र इमारतीचे बांधकाम करणे या **₹८,०९,१६,५६०/- (अक्षरी-रुपये आठ कोटी नऊ लक्ष सोळा**

**हजार पाचशे साठ फक्त)** इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भाधीन क्र. २ येथील पत्रान्वये मुख्य अभियंता सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांच्या तांत्रिक सहमतीसह प्राप्त झालेल्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर अंदाजपत्रक हे सन २०२१-२२ च्या दरसूचीवर आधारीत आहे.

३. या कामासाठी निधी उपलब्ध झाल्याशिवाय खर्च करण्यात येऊ नये याची दक्षता संबंधितांनी घ्यावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच अनुक्रमांक (१), नियम क्र. १३४ व सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१० /इमा-२, दि.२५.०९.२०१९ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. तसेच सदर कामे करताना यासंदर्भात सार्वजनिक बांधकाम विभाग व वित्त विभागाने वेळोवेळी निश्चित केलेल्या प्रचलित नियमांचे पालन करणे बंधनकारक राहील.

५. सदर बाबींवर होणारा खर्च मागणी क्र. एच-८, ४२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण यावरील भांडवली खर्च १०३ महिला कल्याण, (००)(०१) ५३ मोठी बांधकामे लेखाशिर्ष ४२३५-०२५१ या लेखाशिर्षावर या लेखाशिर्षाखाली उपलब्ध होणाऱ्या निधीतून भागाविण्यात येईल.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२४०३१३१८१८२४६५३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASAD VINAYAKRAO KULKARNI

Digitally signed by PRASAD VINAYAKRAO KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=83b8be9eb843dd6eccbd6aa4f9eecd0b5f7ac a67ff32b2eef7b9ed2d85ab9442, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7D19730DDF785210D50C28934B75E9 B7B4F5D06B6181CF1901CE3E48EC9E3985, cn=PRASAD VINAYAKRAO KULKARNI
Date: 2024.03.14 10:49:04 +05'30'

(प्र.वि. कुलकर्णी)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ /२, मुंबई /नागपूर.
२. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१ / २, मुंबई /नागपूर.
३. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
६. सहाय्यक आयुक्त (भिप्रशा), महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई.
१०. निवड नस्ती, का-०९.